**करड, जि.सातारा येथे उप प्रादेशिक परिवहन अधिकारी दर्जाचे नवीन कार्यालय सुरु करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्र. एमव्हीडी-०७१०/प्र.क्र.३४२/परि-४ (१)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक - २४ ऑगस्ट, २०११.

**वाचा :-** परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.संकीर्ण/पआ/न.का.का.१०/२०११/ जा.क्र.५९९९, दि.१६.५.२०११.

**प्रस्तावना** :- मोटार वाहन विभागातील उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, सातारा या कार्यालयाच्या अंतर्गत कराड व पाटण हे तालुके येतात. सदर तालुके सातारा जिल्हयापासून अनुक्रमे ५३ व ६६ किलोमीटर अंतरावर आहेत. त्यामुळे कराड व पाटण तालुक्यातील नागरिकांना परिवहन कामकाजासाठी सातारा कार्यालयात येण्याकरिता बरेच अंतर पार करावे लागते. यास्तव सदर दोन्ही तालुक्यातील नागरिकांची गैरसोय टाळण्यासाठी कराड येथे नवीन उप प्रादेशिक परिवहन अधिकारी दर्जाचे कार्यालय स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** : कराड, जि.सातारा येथे उप प्रादेशिक परिवहन अधिकारी दर्जाचे नवीन कार्यालय सुरु करण्यास याद्वारे शासन मंजूरी देत आहे. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, कराड या कार्यालयाच्या भौगोलिक परिक्षेत्रात कराड व पाटण हे २ तालुके राहतील.

२. नवनिर्मित उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, कराड या कार्यालयासाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे ३५ पदे नव्याने निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतन संरचना | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | उप प्रादेशिक परिवहन अधिकारी | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४८०० | १ |
| २ | सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४६०० | १ |
| ३ | मोटार वाहन निरीक्षक | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४५०० | ४ |
| ४ | सहायक मोटार वाहन निरीक्षक | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० | ३ |
| ५ | मुख्य लिपिक (शहर) | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० | १ |
| ६ | वरिष्ठ लेखा परिक्षक | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४३०० | १ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० | ४ |
| ८ | मुख्य रोखपाल | ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० | १ |
| ९ | सहायक रोखपाल | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | ३ |
| १० | लिपिक-टंककलेखक | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | १० |
| ११ | लघु-टंकलेखक | ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० | १ |
| १२ | टंकलेखक | ५२००-२०२०० + ग्रेड पे २००० | १ |
| १३ | वाहन चालक | ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० | २ |
| १४ | शिपाई | ४४७०-७४४० + ग्रेड पे १३०० | १ |
| १५ | स्वच्छक | ४४७०-७४४० + ग्रेड पे १३०० | १ |
| | **एकूण** | | ३५ |

३. सदरचे नवीन कार्यालय सुरु करण्यासाठी सध्या खाजगी जागा भाडे तत्वावर घेण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. याबाबतची सर्व कार्यवाही परिवहन आयुक्तांनी तात्काळ करावी.

४. सदर नवनिर्मित कार्यालयासाठी २ नवीन वाहनांना मंजूरी देण्यात येत आहे. सदर वाहने घेण्यापूर्वी वाहन आढावा धोरण समितीची मान्यता घेण्यात यावी.

५. या कार्यालयासाठी येणारा अंदाजित आवर्ती रु.२८.६३ लक्ष व अनावर्ती रु. २६.३५ लक्ष असा एकूण रु.५४.९८ लक्ष इतक्या खर्चाची तरतूद आगामी हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे करुन देण्यात येईल. याबाबतचा प्रस्ताव परिवहन आयुक्तांनी शासनास सादर करावा. तोपर्यंत सदर खर्च उपलब्ध कार्यालयीन खर्चातून भागविण्यात यावा.

६. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, कराड यांना सदर कार्यालयाचे प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून मुंबई वित्तीय नियमावली, १९५९ व महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ नियम १५ (३) मध्ये नमूद केलेल्या अधिकारांचा ते वापर करुन शकतील.

७. सदर उप प्रादेशिक कार्यालय सुरु करण्याकरिता येणारा खर्च मागणी क्र.बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१ वाहनांवरील कर - ००१ संचालन व प्रशासन (०२) प्रादेशिक कार्यालये - दत्तमत (योजनेतर) (२०४१ ००३६) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०८/११/व्यय-८, दि.५.७.२०११ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाची वेबसाईट www.maharashtra.gov.in यावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(भि.रा.वाढवे)
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व प्रादेशिक परिवहन कार्यालये,
सर्व उप प्रादेशिक परिवहन कार्यालये,
जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
वित्त विभाग (व्यय-८/विनियम), मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-
संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
निवड नस्ती, परि-४.